नागपूर जिल्ह्यातील नागपूर-ग्रामीण तालुक्यातील ८ ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१६/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- २७ जून, २०१८.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.का-प्रआ/६८४९, दि. ०६/१२/२०१७.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रान्वये नागपूर जिल्ह्यातील नागपूर-ग्रामीण तालुक्यातील ८ ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. सदर रस्त्यांवरील वाढती वाहतूक वर्दळ व औद्यौगीकरण विचारात घेता हे रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव विचारात घेऊन नागपूर जिल्ह्यातील नागपूर-ग्रामीण तालुक्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी (कि.मी.) | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | नागपूर (राज्यमार्ग-३४०) ते पिपळा - किरणापूर - खरसोली - काळडोंगरी - वडद ते प्रमुख जिल्हा मार्ग-३५ ला जोडणारा रस्ता. | ग्रामीण मार्ग ११४ | (०/०० ते ४/००) ४.०० कि.मी. | २०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१३२ |
| | | ग्रामीण मार्ग १२५ | (०/०० ते ४/००) ४.०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग १३८ | (०/०० ते ४/५००) ४.५०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग १४१ | (०/०० ते ४/५००) ४.५०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग १४० | (०/०० ते ३/००) ३.०० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | नागपूर (राज्यमार्ग-३४०) ते बेसा पॉवर हाऊस ते नरसाळा - अड्याळी - कळमना उमरगांव ते प्रमुख जिल्हा मार्ग-३५ ला जोडणारा रस्ता. | ग्रामीण मार्ग ११० | (०/०० ते ७/००) ७.०० कि.मी. | १३.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१३३ |
| | | ग्रामीण मार्ग १२७ | (०/०० ते ३/००) ३.०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग १२८ | (०/०० ते ३/००) ३.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **३३.०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नागपूर जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या लांबीत ३३.०० कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी (२८९९.७८० + ३३.००) म्हणजेच २९३२.७८० कि. मी. इतकी व ग्रामीण मार्ग लांबीत ३३.०० कि.मी. ने घट होवून एकूण लांबी (७७८०.२४० - ३३.००) म्हणजेच ७७४७.२४० कि. मी. इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०६२७१५१५४३३८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2018.06.27 15:20:47 +05'30'

**( स्वरूप रायपुरे )**
उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी,
महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,नागपूर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नागपूर(यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.